**यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजनेंतर्गत मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर येथे २० लाभार्थ्यांकरीता १ वसाहत निर्माण करण्यास कार्योत्तर मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : यचमु-२०२३/प्र.क्र.१५५/योजना-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ जून, २०२३.

<u>संदर्भ</u> :- १) शासन निर्णय विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.गृनियो-२०१७/प्र.क्र.६०/ विजाभज-१, दिनांक २४.०१.२०१८.
२) शासन शुध्दीपत्रक विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.गृनियो-२०१७/प्र.क्र.६०/ विजाभज-१, दिनांक ०८.०१.२०१९.
३) शासन शुध्दीपत्रक विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.गृनियो-२०१७/प्र.क्र.६०/ विजाभज-१, दिनांक ०८.०३.२०१९.
४) शासन शुध्दीपत्रक निर्णय विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.गृनियो-२०१७/ प्र.क्र.६०/ विजाभज-१, दिनांक ११.०९.२०१९.
५) सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, नागपूर यांचे क्रमांक १२६०/ दिनांक २७.०२.२०२३ चे पत्र.

**<u>शासन निर्णय</u> :-**

विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातील घटकांसाठी यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजनेंतर्गत शासन निर्णय संदर्भ क्रमांक १ व शासन शुध्दीपत्रक संदर्भ क्र. २ ते ४ अन्वये जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना जिल्हा समिती, नागपूर यांनी मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर येथील २० लाभार्थ्यांकरीता १ वसाहत निर्माण करण्यासंदर्भात दिनांक ०७.०६.२०१६ रोजीच्या प्रशासकीय मंजूरी आदेशासोबतच्या “परिशिष्ट अ” मधील २० लाभार्थ्यांकरीता १ वसाहत निर्माण करण्याचा अंतिम केलेला प्रस्ताव सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, नागपूर यांनी संदर्भ क्र. ५ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

२. यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजनेंतर्गत मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर येथील २० लाभार्थ्यांची १ वसाहत निर्माण करण्यास तसेच सदरहू वसाहतीकरीता रु. ८८,६२,०००/- (अक्षरी रुपये अठ्ठ्याऐंशी लक्ष बासष्ट हजार फक्त) आणि ४ टक्के प्रशासकीय निधी रु. ९६,०००/- (अक्षरी रुपये शहाण्णव हजार फक्त) असा एकूण रु. ८९,५८,०००/- (अक्षरी रुपये एकोनव्वद लक्ष अठ्ठावण्ण हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजनेंतर्गत मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर येथे निर्माण करावयाच्या १ वसाहतीसाठी सोबत जोडलेल्या “परिशिष्ट “अ” मधील २० लाभार्थ्यांना खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. नागपूर जिल्हास्तरीय समितीने पात्र ठरविलेल्या व छाननी अंती अंतीम केलेल्या लाभार्थ्यांपैकी सोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट “अ” मध्ये नमूद पात्र लाभार्थ्यांनाच सदरहू योजनेचा लाभ अनुज्ञेय राहील.
२. या योजनेंतर्गत लाभार्थी कुटुंबास प्रत्येकी ०५ गुंठे जमीन उपलब्ध करुन देण्यात यावी. सदरहू जागेवर २६९ चौ.फु. क्षेत्रफळाचे घर बांधून, उर्वरित जागेवर विविध शासकीय योजनांद्वारे स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करुन देण्यात यावी.

३. सर्व लाभार्थी विजाभज प्रवर्गातील वैयक्तिक जात प्रमाणपत्र धारक असणे बंधनकारक असून अशाच व्यक्तीस सदरहू योजनेचा लाभ अनुज्ञेय राहील.

४. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांना सन २०२२-२३ या वर्षाचा उत्पन्नाचा दाखला सादर करणे आवश्यक राहील.

५. सर्व लाभार्थ्यांना आदेशाच्या दिनांकापासून एका महिन्यात अधिवास प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

६. लाभार्थ्यांपैकी एखाद्या व्यक्तीच्या नावात, पालकाच्या / वडीलांच्या नावात अथवा आडनावात तफावत असल्यास ती तफावत दुर करण्यासाठी संबंधित व्यक्तीच्या नावाचा, पालकांच्या नावाचा व आडनावाचा पुरावा सादर करणे आवश्यक राहील. नाव/आडनावातील तफावत दुर न झाल्यास अशा व्यक्तीस सदरहू योजनेचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

७. पात्र लाभार्थ्यांची नावे दुबार झाल्यास सदरहू नावे वगळून शासनाच्या धोरणानुसार कार्यवाही करावी.

८. जिल्हास्तरीय समितीने संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतूदींच्या अधीन राहून सदरहू प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही करावी. कोणत्याही परिस्थितीत शासन निर्णयातील अटी व शर्तीचे उल्लंघन होणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. या प्रकरणी लाभार्थ्यांच्या सर्व कागदपत्रांची व अटींची पुर्तता झाल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी ही जिल्हाधिकारी, नागपूर व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर यांची राहील.

५. सदरहू निधी वितरीत करण्यासाठी उप सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांना "नियंत्रक अधिकारी" तसेच सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषीत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी आवश्यक तरतूद संबंधित यंत्रणेस वितरीत करावी. तसेच कामाबाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा.

६. जिल्हाधिकारी, नागपूर व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर यांनी सर्व अटी व शर्तीच्या पुर्ततेशिवाय निधी खर्च करु नये. याकरीता कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त निधी मंजूर केला जाणार नाही.

७. यावरील खर्च "मागणी क्र. झेडजी-३, मुख्य लेखाशिर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण, ०३ मागासवर्गाचे कल्याण, (०१) (०३) विमुक्त जाती भटक्या जमाती यांच्याकरिता यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना (२२२५-ई ८२१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षांतर्गत २०२३-२४ या वर्षात उपलब्ध आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

८. याद्वारे वितरीत करण्यात येणाऱ्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल व शासनास सादर करण्याची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६२११३०५४०४४३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: CN = KAILAS TARACHAND SALUNKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT
Date: 2023.06.21 13:06:32 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. सचिव, (इतर मागास बहुजन कल्याण विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना, नागपूर.
५. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
६. संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामीण गृहनिर्माण, महाराष्ट्र राज्य, सीबीडी-बेलापूर, मुंबई.
७. उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग (प्रादेशिक), नागपूर .
८. सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर.
९. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, नागपूर.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (योजना-१).

इतर मागास बहुजन कल्याण विभाग
शासन निर्णय क्रमांक : यचमु-२०२३/प्र.क्र.१५५/योजना-१
दिनांक :- २१ जून, २०२३

परिशिष्ट-अ

यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजनेंतर्गत सन २०२३-२४ मध्ये कार्योत्तर मान्यता देण्यात येत असलेल्या मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर येथे स्थापन करावयाच्या वसाहतीसाठी पात्र २० लाभार्थ्यांची यादी.

| अ.क्र. | नाव | पत्ता |
|---|---|---|
| १ | श्री. शंकर माणिक सुरतकर | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| २ | श्री. गजानन उपासराव माहुरे | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| ३ | श्री. नंदकिशोर गजानन सुरतकर | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| ४ | श्री. ज्ञानेश्वर भिमराव सुरतकर | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| ५ | श्री. अक्षय सुरेश माहुरे | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| ६ | श्री. वसंता माहुरे | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| ७ | श्री. अभिमन्यू ज्ञानेश्वर माहुरे | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| ८ | श्री. बाबुलाल माणिक सुरतकर | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| ९ | श्री. गंगाधर दौलत माहुरे | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| १० | श्री. अनिल प्रभाकर माहुरे | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| ११ | श्री. विजय सुरतकर | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| १२ | श्री. कृष्णराव शंकर जगताप | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| १३ | श्री. दशरथ शंकर जगताप | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| १४ | श्री. विनोद सुरतकर | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| १५ | श्री. अंकुश श्रीराम माहुरे | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| १६ | श्री. रमेश मधुकर सुरतकर | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| १७ | श्री. साजन सुरतकर | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| १८ | श्री. राजकुमार भिमराव सुरतकर | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| १९ | श्रीमती लता शंकर जगताप | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |
| २० | श्री. विलास सुरतकर | मौजा पिपळा (भ.), ता.सवनेर, जि.नागपूर |

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: CN = KAILAS TARACHAND SALUNKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT
Date: 2023.06.21 13:06:47 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**